**सह संचालक, औद्योगिक सुरक्षा व आरोग्य,वसई हे कार्यालय देवछाया आदर्श कमर्शिअल सेंटर, दुसरा व तिसरा मजला, गुरुद्वाराच्या मागे, गुरुनानकनगर, अंबाडी रोड, वसई (पश्चिम), जि. पालघर या नवीन जागेत (भाडेतत्वावर) स्थलांतरीत करण्यास मजूरी देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**उद्योग, ऊर्जा, कामगार व खनिकर्म विभाग**

**शासन निर्णय क्रमांक : औसुवआ ०२२४/प्र.क्र.३५/काम.१**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,

मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.

दिनांक : २७ मार्च, २०२४

**संदर्भ :-** प्रभारी संचालक,औद्योगिक सुरक्षा व आरोग्य संचालनालय,मुंबई यांचे पत्र क्र. संऔसुवआ/आस्थापना/३७४२/२,दि.१६/२/२०२४क्र.सं औसुवआ/आस्थापना/४१५६/२, दि.४/३/२०२४.

**प्रस्तावना:-**

सह संचालक, औद्योगिक सुरक्षा व आरोग्य, वसई हे कार्यालय सद्यस्थितीत मंगेश भुवन, १ला मजला, अंबाडी रोड, वसई (पश्चिम) येथे भाडेतत्वावर स्थित आहे. सदरील कार्यालय हे सन १९९८ पासून भाडेतत्वावर सदरहू इमारतीत कार्यरत आहे. सदरील कार्यालयाचा भाडेतत्वावरचा करार दिनांक ३१.०१.२०१३ रोजी संपूष्टात आला आहे.

सदर कालावधीत कार्यकारी अभियंता यांचे जा.क्र. ठावि/रेशा/प्र.क्र.व्ही-३०(२)/३८७१, दिनांक ०७.०४.२०११ अन्वये वाजवी भाडे प्रमाणपत्र दिनांक ०१.०२.२००८ ते ३१.०१.२०१३ पर्यंत २०२५ चौ. फुट एवढया चटई क्षेत्राकरीता दरमहा रु.३५/- प्रती चौरस फुटाप्रमाणे रु.७०,८७५/- इतके मंजूर केले होते. कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, पालघर यांचे दिनांक १२.०३.२०२० चे पत्रानुसार दिनांक रु. १८.३८/- प्रती चौरस फुट प्रमाणे रु. ३७,२२२/-भाडे ठरविण्यात आले आहे. परंतु तो दर सदर जागेचे मालक व इतर ३ यांना मान्य नसल्याचे कळविले होते.

तत्पुर्वी प्रचलित बाजारभावाप्रमाणे भाडेवाढ न दिल्यास जागा सोडण्याबाबत जागा मालकानी त्यांचे वकीलामार्फत दिनांक १७.०२.२०२० रोजी नोटीस दिलेली होती. तसेच नविन दराने जागा मालकाने भाडे स्विकारणे मार्च २०१९ पासून बंद केलेले आहे. ( खटला क्रमांक-६१/२०२०, दिनांक २०/०८/२०२०). तसेच सदर प्रकरण न्यायप्रविष्ट होते. परंतु तदनंतर दिनांक २१/०४/२०२३ रोजी सदर प्रकरणाचा निकाल शासनाच्या विरोधात लागलेला असुन, हुकूमनामासुध्दा काढलेला आहे. मा.न्यायालयाने सदरील भाड्याची जागा रिकामी करण्याचे निर्देश दिलेले आहेत. सबब हुकूमनाम्याची अंमलबजावणी झाल्यास तात्काळ सदर कार्यालयीन जागा रिकामी करावी लागणार आहे.

यास्तव सध्याच्या कार्यालयाच्या शेजारी श्रीमती बिमला किशोरीलाल शर्मा यांच्या मालकीची साधारणपणे २५०० स्क्वे. फुट जागा देवछाया आदर्श कमर्शिअल सेंटर, दुसरा व तिसरा मजला, गुरुद्वाराच्या मागे, गुरुनानकनगर, अंबाडी रोड, वसई (पश्चिम), जि. पालघर येथे उपलब्ध असून, त्यांचेसोबत सह संचालक,औसुवआ,वसई यांनी नवीन भाडेकरार केला आहे, असे संचालनालयाने संदर्भीय दि. १६/२/२०२४ व दि.४/३/२०२४ रोजींच्या पत्राव्दारे शासनास कळविले.

सबब, सह संचालक, औद्योगिक सुरक्षा व आरोग्य,वसई हे कार्यालय देवछाया आदर्श कमर्शिअल सेंटर, दुसरा व तिसरा मजला, गुरुद्वाराच्या मागे, गुरुनानकनगर, अंबाडी रोड, वसई (पश्चिम), जि. पालघर या नवीन जागेत (भाडेतत्वावर) स्थलांतरीत करण्यास मंजूरी देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. यानुषंगाने पुढीलप्रमाणे निर्णय घेण्यात येत आहे.

**शासन निर्णयः-**

सह संचालक, औद्योगिक सुरक्षा व आरोग्य,वसई हे कार्यालय देवछाया आदर्श कमर्शिअल सेंटर, दुसरा व तिसरा मजला, गुरुद्वाराच्या मागे, गुरुनानकनगर, अंबाडी रोड, वसई (पश्चिम), जि. पालघर या नवीन जागेत (भाडेतत्वावर) स्थलांतरीत करण्यास या शासन निर्णयाव्दारे शासन मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२४०३२७१२४९०७६११० असा आहे. हा शासन आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

KARANSING PREMSING PATIL

Digitally signed by KARANSING PREMSING PATIL
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=INDUSTRIES ENERGY LABOUR AND MINING DEPARTMENT, 2.5.4.20=6f2521c3a6d1f8429a3c2c9a42d575298ae82956908d63df441063695f377819, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=C7FEED7178D6C14666A5DF36811F1763590E65B6F836A87E63789DC234173D66, cn=KARANSING PREMSING PATIL
Date: 2024.03.27 12:58:48 +05'30'

**( क.प्रे.पाटील )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. मंत्री (कामगार) यांचे खाजगी सचिव
२. मा. प्रधान सचिव (कामगार) यांचे स्वीय सहायक
३. संचालक, औद्योगिक सुरक्षा व आरोग्य संचालनालय, मुंबई
४. सह संचालक, औद्योगिक सुरक्षा व आरोग्य,वसई
५. महालेखापाल-१/२,लेखा परिक्षा/लेखा व अनुज्ञेयता, महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर.
६. उपसचिव/ अवर सचिव (काम-१), उद्योग, ऊर्जा, कामगार व खनिकर्म विभाग
७. निवड नस्ती (काम-१)